नक्षलवादी कारवाईसह अतिरेकीविरोधी कारवाई, दरोडेखोरी, संघटीत गुन्हेगारी विरोधी कारवाई व आपात्कालीन काळात मदत करतांना पोलीस अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना नुकसान भरपाई व इतर सोयी सुविधा देण्याबाबत ...

**महाराष्ट्र शासन**

शासन पूरकपत्र क्र.पीडब्ल्यूएफ १००८/प्र.क्र.८/पोल-७,

गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : २९ ऑगस्ट, २००९

**संदर्भ :** १) शासन निर्णय क्र.पीडब्ल्यूएफ १००३/प्र.क्र.८/पोल-७, दि.१६ मार्च, २००५

२) पूरक पत्र क्र.पीडब्ल्यूएफ १००३/प्र.क्र.८/पोल-७, दि.६ जुलै, २००५

३) शासन निर्णय, क्र.पीडब्ल्यूएफ १००८/प्र.क्र.८/पोल-७, दि.२९.११.२००८

**पूरक पत्र :-**

शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीडब्ल्यूएफ १००८/प्र.क्र.८/पोल-७, दि.२९.११.२००८ मधील "ब" ऐवजी खालीलप्रमाणे मजकूर वाचण्यात यावा :-

ब) "नक्षलवादी कारवाईसह अतिरेकीविरोधी कारवाई, दरोडेखोरी, संघटीत गुन्हेगारी विरोधी कारवाई व आपात्कालीन काळात मदत करतांना मृत व जखमी झालेल्या पोलीस अधिकारी/कर्मचाऱ्याच्या कुटुंबियांना, मृत व्यक्ति जणू काही मृत झाली नव्हती असे मानून सदर व्यक्ति सेवेत असती तर मृत्यूच्या वेळी जे पद धारण करीत होती त्या पदावरुन वरच्या पदावर पदोन्नतीसाठी ज्या ज्या वेळी पात्र ठरली असती त्या त्या वेळी सदर व्यक्ति पदोन्नत झाली असे गृहीत धरुन त्या व्यक्तिची वेतन निश्चिती करण्यात यावी. त्यानुसार पदोन्नतीच्या पदावर निश्चित करण्यात आलेले वेतन मृत व्यक्तिच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत देय राहील."

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नांवाने व आदेशानुसार,

(सु.बा.तुंबारे)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२. संचालक, अँटी करप्शन ब्युरो, महाराष्ट्र राज्य, मुंबई

G:\Bharpai.lwp

३. विशेष पोलीस महानिरीक्षक (नक्षलवादी प्रतिबंधक कारवाया), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. सर्व पोलीस आयुक्त
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) १/२, मुंबई/नागपूर
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०. वित्त विभाग (व्यय-७)
११. गृह विभाग (कार्यासन पोल १ मं १५ व विशा-१अ/१ब ते विशा-८, व्रीयुडी-१